

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय (विस्तार), दालन क्र.५५७, ५ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-२२७९३३४४ Email ID : desk१४gad-mh@gov.in

**स्मरणपत्र**

क्रमांक: प्रतिनि-१०२३/प्र.क्र.१२/का.१४ दिनांक : २६ एप्रिल, २०२३

**प्रति,**

सह /उप सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**विषय :** मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक महामंडळ, मुंबई येथील व्यवस्थापकीय संचालक हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत
मंत्रालयीन सह सचिव/उप सचिव यांच्याकडून इच्छुकता मागविण्याबाबत.

**संदर्भ :** शासनाचे दि.०६.०२.२०२३ रोजीचे समक्रमांकाचे पत्र

**महोदय/ महोदया,**

संदर्भाधीन पत्रान्वये अल्पसंख्यांक विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाच्या व्यवस्थापकीय संचालक या पदावर मंत्रालयीन सह/उप सचिव संवर्गातील अधिकारी प्रतिनियुक्तीने उपलब्ध करून देण्याबाबत इच्छुकता मागविण्यात आली होती. तथापि, त्या अनुषंगाने मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाचे व्यवस्थापकीय संचालक हे पद अद्यापही रिक्त आहे.

२. तरी, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाच्या व्यवस्थापकीय संचालक हे पद भरण्यासाठी मुदतवाढ देण्यात येत आहे. त्यानुषंगाने सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाच्या व्यवस्थापकीय संचालक या पदावर प्रतिनियुक्तीने जाण्यासाठी इच्छुक असलेल्या आपल्या विभागातील सह सचिव/उप सचिवांची नावे, त्यांचे मागील पाच वर्षांच्या गोपनीय अहवालांच्या प्रमाणित प्रतींसह, वैयक्तिक माहिती (Bio-data), संपूर्ण सेवा तपशील (कालावधी, विभाग, पद), ना-विभागीय चौकशीचे प्रमाणपत्र व विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र इत्यादी माहिती या विभागाकडे दि.२६.०४.२०२३ पर्यंत निश्चितपणे प्राप्त होतील अशा रितीने पाठविण्यात यावी. तसेच कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास निरंक असेही या विभागास कळवावे, ही विनंती.

३.     सदर स्मरणपत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०४२६१६४७०१२१०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**आपला,**

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.04.26 16:54:34 +05'30'

**(वि.बा.माने)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत : विवरणपत्र**

**प्रत-  निवडनस्ती सा.प्र.वि./कार्यासन-१४**

**विवरणपत्र**

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>मुद्दा</th><th>तपशिल/अभिप्राय</th></tr>
<tr><td>१</td><td>अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव</td><td></td></tr>
<tr><td>२</td><td>जन्मदिनांक</td><td></td></tr>
<tr><td>३</td><td>शैक्षणिक अर्हता</td><td></td></tr>
<tr><td>४</td><td>स्थायित्व प्रमाणपत्र</td><td></td></tr>
<tr><td>५</td><td>भ्रमणध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>६</td><td>मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.)</td><td></td></tr>
<tr><td>७</td><td>मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>८</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>९</td><td>संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा)</td><td><table><tr><td>दिनांकापासून ते दिनांकापर्यंत</td><td rowspan="3">पद /प्रतिनियुक्तीचे ठिकाण</td></tr><tr><td></td></tr><tr><td></td></tr><tr><td colspan="2">एकूण कालावधी</td></tr></table></td></tr>
<tr><td>१०</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>११</td><td>संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय?</td><td></td></tr>
<tr><td>१२</td><td>प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे.</td><td></td></tr>
</table>